**कौटुंबिक न्यायालय, सांगली या न्यायालयासाठी रु.५०००/- स्थायी अग्रीमाची रक्कम मंजुर करणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः कौटुन्या-१९२०/प्र.क्र.६७/का-९**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २१ ऑगस्ट, २०२०

**वाचा :-**

१. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५.
२. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र. कौटुन्या -१११६/ प्र.क्र.२२२ /का-९, दि. १८.०८.२०१७.
३. विधि व न्याय विभाग अधिसूचना क्र. FMC-१११६/C.R.२२२/D-IX, दि.२१.०१.२०२०.
४. कौटुंबिक न्यायालय, सांगली यांचे पत्र जा. क्र. ४०८/२०२०, दि.२७.०७.२०२०.

**प्रस्तावना:-**

उपरोक्त संदर्भ क्र. ४ येथील पत्रान्वये कौटुंबिक न्यायालय, सांगली यांनी कौटुंबिक न्यायालय, सांगली या कार्यालयासाठी स्थायी अग्रीमाची रक्कम मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयानुसार कौटुंबिक न्यायालय, सांगली या कार्यालयासाठी रु.५०००/- स्थायी अग्रीमाची रक्कम मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कौटुंबिक न्यायालय, सांगली या न्यायालयासाठी रु.५०००/- स्थायी अग्रीमाची रक्कम मंजुर करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मध्ये उद्धृत केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-१, उप विभाग-२ मधील अ. क्र. १२ नियम क्र.५६ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८२४१४४१२०५३१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Uday Balkrishna Shukla

Digitally signed by Uday Balkrishna Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25569b2f94f1c4543dd14cfd7554a74f343a754d96291ae76706a168af42cab3, serialNumber=7b8594c3caa0542cc27f913c48e1f9c0084209e339cce7fd9de455fe24a26bbb, cn=Uday Balkrishna Shukla
Date: 2020.08.24 14:46:46 +05'30'

**( उदय बा. शुक्ल )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति:** १. मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.

२. महालेखापाल -एक व दोन (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
३. प्रमुख न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, सांगली.
४. न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, सांगली.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली.
६. विधि व न्याय विभाग कार्या. २३/२४/२५
७. निवडनस्ती.